"निसर्ग" चक्रीवादळामुळे निर्माण झालेली परिस्थिती हाताळण्यासाठी रायगड, रत्नागिरी जिल्हयांना निधी वितरित करण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन

**महसुल व वन विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०२०/प्र.क्र.१३६(भाग-२)/म-३**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : ११ जून, २०२०

संदर्भ : १) शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म -३, दिनांक १३.०५.२०१५

२) शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०१७/प्र.क्र.२६७/म -३, दिनांक २५.०१.२०१८

३) शासन निर्णय, समक्रमांक , दिनांक ०५.०६.२०२०

४) शासन निर्णय, क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र.१३६/म -३, दिनांक १०.०६.२०२०

प्रस्तावना:

दिनांक ३ जून ,२०२० रोजी "निसर्ग" चक्रीवादळाचा तडाखा राज्यातील काही जिल्हयांमध्ये बसला आहे. या चक्रीवादळामुळे रायगड व रत्नागिरी ,सिंधुदुर्ग या जिल्हयामध्ये नागरिकांना स्थलांतरित केल्यामुळे तसेच घरांच्या पडझडीमुळे मदत छावण्यांमध्ये दाखल झालेल्या नागरिकांना अन्न,पाणी, निवारा व वैद्यकीय देखभाल या सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी तसेच चक्रीवादळामुळे सार्वजनिक ठिकाणी जमा झालेला कचरा, ढिगारे उचलून स्वच्छता करण्यासाठी उपरोक्त नमूद केलेल्या संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये रू. १.२५ कोटी इतका निधी रायगड व रत्नागिरी जिल्हयांना वितरित करण्यात आलेला आहे. याच प्रयोजनासाठी तसेच बहुवार्षिक पिकांचे नुकसान, मृत जनावरांसाठी मदत, पुर्णत: नष्ट/अंशत: पडझड झालेली कच्ची/पक्की घरे, नष्ट झालेल्या झोपडया या बाबींकरिता रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या जिल्हयांतील बाधित व्यक्ती/शेतकऱ्यांना वाढीव दराने मदत देण्याबाबत दिनांक ९.६.२०२० रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णयानुसार संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. सदर वाढीव दरानुसार बाधितांना मदतीचे वाटप करण्यासाठी संबंधित जिल्हयांना राज्य आपत्ती प्रतिसाद निधी व राज्य शासनाच्या निधीमधुन निधी उपलब्ध करून देण्याचा निर्णय राज्य कार्यकारी समितीच्या दिनांक ११.६.२०२० रोजी झालेल्या बैठकीमध्ये घेण्यात आला आहे. त्यानुसार निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:

"निसर्ग" चक्रीवादळामुळे मदत छावणीमध्ये आश्रय घेतलेल्या व्यक्तींकरिता तात्पुरती राहण्याची व्यवस्था,अन्नधान्य, कपडे, औषधोपचार इत्यादीकरिता, सार्वजनिक ठिकाणी जमा झालेला कचरा, ढिगारे उचलून स्वच्छता करण्यासाठी, बहुवार्षिक पिकांचे नुकसान , मृत जनावरांसाठी मदत, पुर्णत: नष्ट/अंशत: पडझड झालेली कच्ची/पक्की घरे, नष्ट झालेल्या झोपडया या बाबींकरिता रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या

जिल्हयांना विभागीय आयुक्त,कोकण यांचेमार्फत राज्य आपत्ती प्रतिसाद निधी व राज्य शासनाच्या निधीमधून खालीलप्रमाणे संबंधित लेखाशीर्षाखाली निधी मंजूर करण्यात येत आहे.

(रूपये लाखात)

| बाब | लेखाशीर्ष | रायगड | रत्नागिरी | सिंधुदुर्ग | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| नैसर्गिक आपत्तीमध्ये घरे पुर्णत: क्षतीग्रस्त झाली असल्यास कपडे तसेच घरगुती भांडी / वस्तुंकरिता अर्थ सहाय्य | २२४५ ०१५५ | रू ७५०.०० | रू.३५०.०० | -- | रू.११००.०० |
| | २२४५ २१९४ | रू. ७५०.०० | रू.३५०.०० | -- | रू.११००.०० |
| मदत छावणीमध्ये आश्रय घेतलेल्या व्यक्तींकरिता तात्पुरती राहण्याची व्यवस्था,अन्नधान्य, कपडे, औषधोपचार इत्यादीकरिता | २२४५ ०२१७ | -- | रू १०.०० | -- | रू १०.०० |
| सार्वजनिक क्षेत्रातील जमा झालेला कचरा व ढिगारे उचलणे | २२४५ ०२४४ | रू २००.०० | रू १००.०० | -- | रू ३००.०० |
| बहुवार्षिक पिकांचे नुकसान | २२४५ २४५२ | रू ७९२.०० | रू २८८.०० | -- | रू १०८०.०० |
| | २२४५ २३०९ | रू १४०८.०० | रू ५१२.०० | -- | रू १९२०.०० |
| मृत जनावरांसाठी मदत | २२४५ ०३१५ | रू १२.०० | रू ५.०० | -- | रू १७ .०० |
| पुर्णत: नष्ट/मोठया प्रमाणावर / अंशत: पडझड झालेली कच्ची/पक्की घरे, नष्ट झालेल्या झोपडया | २२४५ ०२७१ | रू १८३८.०० | रू ६१३.०० | रू २२.७९ | रू २४७३.७९ |
| | २२४५ २३२७ | रू ११६२.०० | रू ३८७.०० | रू १४.४० | रू १५६३.४० |
| दुकानदार व टपरीधारकांना मदत | २२४५ २३८१ | रू १००.०० | रू ५०.०० | -- | रू १५०.०० |
| एकूण | | रू ७०१२.०० | रू २६६५.०० | रू ३७.१९ | रू. ९७१४.१९ |

उपरोक्त निधी बीम्स प्रणालीवर विभागीय आयुक्तांना कार्यासन म-११ यांनी तात्काळ वितरित करावा.

३. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा.

४. पंचनामे करण्यात आल्यानंतर लाभार्थी निश्चित करण्यात यावेत. त्यानंतरच रक्कम आहरित करून लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये हस्तातंरित करावी. सदर निधी अनावश्यकरित्या आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा. **लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा**.

५. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी

त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून तसेच राज्य शासनाच्या निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

६. वरील प्रयोजनासाठी प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी अंतर्गत वरील विवरणपत्रात दर्शविलेल्या सर्व उप/गौण शिर्षाखाली निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १००/२०२०/व्यय-९, दिनांक ११.०६.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००६१११७३२५३७५१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( सु.ह.उमराणीकर )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
४. विभागीय आयुक्त,कोकण,
५. जिल्हाधिकारी, रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
८. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड/रत्नागिरी /सिंधुदुर्ग,
१०. मा.मंत्री ( मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
११. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१२. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१३. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१४. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१५. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )